राज्यातील सर्व माथाडी मंडळ व सुरक्षा रक्षक मंडळांचे लेखापरीक्षण करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या राज्यस्तरीय पॅनलला मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. युडब्ल्यूए-१३१२/प्र.क्र.३२०९/ कामगार-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ जानेवारी, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.युडब्ल्यूए-१३१२/प्र.क्र.३२०९/ कामगार-५, दि. १७ जुलै, २०१२.
२) शासन निर्णय क्र.युडब्ल्यूए-१३१२/प्र.क्र.३२०९/ कामगार-५, दि. ६ एप्रिल, २०१३.
३) कामगार आयुक्त यांचे पत्र क्र.सुरक्षा/मुंबई/२०१६/कार्यासन-१४,दि. ५ जानेवारी,२०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ च्या कलम ८ व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ च्या कलम ९ नुसार महाराष्ट्रातील कामगार विभागांतर्गत सर्व माथाडी मंडळे व सुरक्षा रक्षक मंडळे यांच्या लेखापरीक्षणासाठी संदर्भाधीन दि. १७ जुलै, २०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यपध्दती निश्चित करण्यात आली होती. सदर कार्यपध्दतीनुसार तीन वर्षांकरीता दि. ६ एप्रिल, २०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार १४ सनदी लेखापरीक्षकांच्या पॅनलला मान्यता देण्यात आली होती. तथापि, दि. १७ जुलै, २०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रस्तुत पॅनलची मुदत ही शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ३ वर्षांसाठी म्हणजेच दि. ५ एप्रिल, २०१६ पर्यंतच होती. प्रस्तुत ३ वर्षांच्या कालावधीत काही माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांनी त्यांचे लेखापरीक्षण अहवाल पूर्ण केले असले तरीही अद्यापपर्यंत बहुतांशी माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांचे लेखा अहवाल अद्ययावत होणे प्रलंबित असल्याने दि. ६ एप्रिल, २०१३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे गठीत करण्यात आलेल्या लेखा पॅनलला मुदतवाढ देण्याची संदर्भाधीन क्र. ३ मधील दि. ५ जानेवारी, २०१७ रोजीच्या पत्रान्वये कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विनंती केली होती. त्यानुसार लेखा पॅनलला मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

दि. ६ एप्रिल, २०१३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे गठीत करण्यात आलेल्या लेखा पॅनलला दि. ६ एप्रिल, २०१६ पासून ते ३० एप्रिल, २०१७ पर्यंत एक वर्षासाठी पुढील अटीच्या अधीन राहून, मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढीच्या कालावधीत सर्व माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांचे अद्ययावत लेखापरीक्षणाचे काम पूर्ण करुन अहवाल शासन मान्यतेस्तव सादर करण्याबाबत कामगार आयुक्त यांचेस्तरावर एक विशेष मोहिम राबविण्यात यावी व मंडळाचे अहवाल माहे फेब्रुवारी, २०१७ अखेरपर्यंत पटलावर ठेवण्यासाठी शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०११८१६२२३८६६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2017.01.18 16:26:36 +05'30'

**(व.मुं. भरोसे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक.
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सह आयुक्त (माथाडी), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अपर कामगार आयुक्त, पुणे/नागपूर.
७) अध्यक्ष, सर्व सुरक्षा रक्षक मंडळे.
८) अध्यक्ष, सर्व माथाडी मंडळे.
९) निवड नस्ती (कामगार-५).